**बृहन्मुंबई शहरात (महानगरपालिका क्षेत्रामध्ये) वापरण्यात येणाऱ्या खाजगी वाहनांना राजशिष्टाचार बॅज मंजूर करणेबाबत.**

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
क्रमांक:-पीआरबी-१००५/सीआर-४/पोल-८,
मंत्रालय, मुंबई-४०००३२, दिनांक:- ५ मे,२००५

वाचा:- १) शासन पत्र, गृह विभाग, क्र.टिआरए-५८७४/१/पोल-८, दि.६.९.१९७९
२) शासन पत्र, गृह विभाग, क्र.टिआरए-५८७४/१/पोल-८, दि.७.२.२००२

***शासननिर्णय*** :- अतिमहत्वाच्या व्यक्तींकडून/अधिका-यांकडून बृहन्मुंबई शहरात (महानगरपालिका क्षेत्र मर्यादेत) वापरण्यात येणाऱ्या, लाल/पिवळा दिवा नसणा-या , खाजगी मोटार वाहनांना १ वर्ष कालावधीकरीता (जानेवारी ते डिसेंबर) शासन पत्र, गृह विभाग, दि.६.९.७९ व ७.२.२००२ च्या पत्रान्वये विहित केलेल्या अटी व शर्ती नुसार राजशिष्टाचार बॅज मंजूर करण्यात येतात. सदर बॅजबाबतचे पूर्ण नियंत्रण हे सह पोलीस आयुक्त (वाहतूक), बृहन्मुंबई यांचे असते.सध्याच्या बदललेल्या परिस्थितीत राजशिष्टाचार बॅज मंजूर करण्याबाबतच्या प्रचलित मार्गदर्शक तत्वांचा आढावा घेवून त्यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

२.१ त्याअनुषंगाने आता शासनाने सध्याच्या प्रचलित मार्गदर्शक तत्वांचा आढावा घेतला असून शासन पत्र, गृह विभाग, दिनांक ६.७.७९ व ७.२.०२ नुसार विहित केलेली यापूर्वीची मार्गदर्शक तत्वे अधिक्रमितकरुन पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.:-

२.२ राजशिष्टाचार बॅज अनुज्ञेयतेसाठी खालील व्यक्ती पात्र असतील.

१) उच्च न्यायालयाचे न्यायमूर्ती
२) राज्यातील लोकसभा सदस्य/राज्यसभा सदस्य/विधान सभा सदस्य/ विधान परिषद सदस्य
३) ज्यांना राज्यमंत्र्यांचा दर्जा दिलेला आहे व ज्यांची मुख्यालये मुंबईत आहेत असे राज्याचे सार्वजनिक उपक्रम, आयोग (commisions) इ. चे अध्यक्ष
४) मुंबईचे शेरीफ
५) मुंबईचे महापौर

६) सचिव व त्यावरील दर्जाचे राज्य शासनाचे अधिकारी (सामान्य प्रशासन विभागाच्या यादीप्रमाणे)

७) सांविधानिक आयोगाचे अध्यक्ष/सदस्य

८) महाअधिवक्ता,(ॲडव्होकेट जनरल) महाराष्ट्र राज्य, मुंबई ,

९) भारतरत्न, पद्म पुरस्कार, महाराष्ट्र भूषण पुरस्कारांनी भुषविलेल्या सन्माननीय व्यक्ती.

१०) राज्यातील माजी केंद्रीय मंत्री .

११) राज्याचे माजी मुख्यमंत्री व माजी उपमुख्यमंत्री.

२.३ वरीलप्रमाणे वर्गीकरण केलेल्या गटातील व्यक्तींना/अधिका-यांना खालील मार्गदर्शक तत्वाप्रमाणे राजशिष्टाचार बॅज वितरीत करण्यात येतील.

(एक) राजशिष्टाचार बॅजची मुदत वार्षिक (जानेवारी ते डिसेंबर) अशी असून प्रत्येकवर्षी नवीन बॅजचे वितरण करण्यात यावे.

(दोन) राजशिष्टाचार बॅज मिळण्यास पात्र असलेल्या व्यक्तीकडून मोटार वाहनाच्या नोंदणी संबंधिच्या कागदपत्रांच्या छायांकित प्रती जोडून विहित नमुन्यात, विहित शुल्कासह अर्ज प्राप्त झाल्यानंतर सह पोलीस आयुक्त (वाहतूक) बृहन्मुंबई यांच्याकडून राजशिष्टाचार बॅज मंजूर करण्यात येईल.

(तीन) राजशिष्टाचार बॅज हा वाहनाच्या पुढील दर्शनी काचेवर मध्यभागी खालील भागात लावण्यात यावा.

(चार) वर्गीकृत मान्यवरांना त्यांच्या स्वत:च्या वाहनासाठी फक्त एकच राजशिष्टाचार बॅज देण्यात यावा.

(पाच) राजशिष्टाचार बॅज धारकाची बदली झाल्यास किंवा धारण केलेले पद संपुष्टात आल्यास त्यांनी सदर बॅज परत करावा.

(सहा ) सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून बॅज धारकाने सदर बॅजची छायांकीत प्रत निघणार नाही याची दक्षता घ्यावी.

(सात) राजशिष्टाचार बॅज हा पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई यांची मालमत्ता राहणार आहे.

(आठ) राजशिष्टाचार बॅजचे पूर्ण नियंत्रण पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई/सह पोलीस आयुक्त (वाहतूक) बृन्मुंबई यांच्याकडे राहिल. यासाठी बॅजवर अनुक्रमांक नमूद करण्यात यावा. व त्यासाठी आकारण्यात येणाऱ्या शुल्काचे लेखे ठेवण्याची जबाबदारी सह पोलीस आयुक्त( वाहतूक )याचीं राहील.

(नऊ) राजशिष्टाचार बॅज धारकास <u>वाहतुकीचे नियम</u> तसेच इतर <u>कोणत्याही कायद्यातील तरतुदींमधून सवलत/सुट मिळणार नाही.</u>

(दहा) राजशिष्टाचार बॅज धारकास दिलेला बॅज त्यांच्या वाहनासाठीच वापरता येईल व तो दुसऱ्या वाहनास वापरता येणार नाही किंवा हस्तांतरित करता येणार नाही.

(अकरा)ज्या मोटार वाहनांना बिकन (लाल/अंबर) दिवा देण्यांत आलेला आहे अशा वाहनांना राजशिष्टाचार बॅज अनुज्ञेय असणार नाही.

(बारा) पात्र नसलेल्या व्यक्तींना राजशिष्टाचार बॅज कोणत्याही परिस्थितीत देण्यात येवू नये.

(तेरा) राजशिष्टाचार बॅज देण्याबाबत कोणताही वाद निर्माण झाल्यास त्या बाबतचा अंतीम निर्णय शासनाचा राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

( प्र. ता. गौड )
सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

मा.राज्यपालाचे सचिव
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव
मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे सचिव
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
सर्व अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
निबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.(पत्राने )
महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य,मुंबई.
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.
सह पोलीस आयुक्त (वाहतूक) वरळी, मुंबई.
परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
गृह विभाग- (परिवहन-१ व २, सल्लागारमंडळ/विशा-२/पोल-१४ )
निवड नस्ती (पोल-८)

-------

C51 \A:\PROTOCAL BATCH G.R.
एच-456 -2.